खाजगीकरणातून विकसित करण्यात येत असलेल्या तसेच नुतनीकरण व आधुनिकीकरणासाठी प्रस्तावित असलेल्या २५ मे.वॅ. क्षमतेपर्यंतच्या सर्व जलविद्युत प्रकल्पांकरिता राबविण्यात येणा-या निविदांप्रकरणी पश्चात अर्हता पध्दतीचा अवलंब करुन मागविलेल्या निविदांच्या तांत्रिक छाननीसाठी समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्र. जविप्र २०१७/(प्र.क्र.१०३/२०१७)-सुधा १/जवि**

नवीन प्रशासन इमारत, ६ वा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८.१०.२०२०.

संदर्भ : १ शासन पत्र क्र जविप्र १२०८/(प्र.क्र.२५६/०८)/जवि, दि.०७.१०.२००८
२.शासन निर्णय क्र. जविप्र २०१७/(प्र.क्र.१०३/१७)/जवि, दि.०७.०२.२०१९

**प्रस्तावना :**

खाजगीकरणातून विकसित करावयाच्या लहान जलविद्युत प्रकल्पांच्या कामांसाठी पूर्व अर्हता ऐवजी पश्चात अर्हता पध्दतीचा अवलंब करण्याबाबत संदर्भ क्र. २ नुसार शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. अशा प्रकारे मागविलेल्या निविदांच्या तांत्रिक लिफाफ्यांची छाननी करण्याबाबतच्या कार्यपध्दतीबाबत क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून शासनास संदर्भ करण्यात आले होते. खाजगीकरणातून विकसित करावयाच्या लहान जलविद्युत प्रकल्पांचे निविदा दस्तऐवज तयार करतांना, प्रस्तावित जलविद्युत प्रकल्पाकरिता उपलब्ध पाणी साठा, पाणी वापर तक्ता, विविध तलांक, उपलब्ध जमीन, Topography या बाबी प्रकल्पाशी संबंधीत स्थापत्य कार्यालयाकडून उपलब्ध होतात व त्या आधारे निविदा मागविल्या जातात. निविदेच्या मुल्यांकन अहवालास शासन मंजूरी प्राप्त झाल्यावर प्रवर्तकास Letter of Permission (LoP) देण्यात येते, तद्नंतर प्रवर्तक Techno Economic Feasibility Report (TEFR), अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या कार्यालयाकडे सादर करतात. TEFR ला शासन मंजूरी प्राप्त झाल्यावर अधीक्ाक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे कार्यालयामार्फत Letter of Allotment प्रवर्तकास देण्यात येते व प्रादेशिक मुख्य अभियंता (स्थापत्य) कार्यालयांकडून जलविद्युत प्रकल्प विकसन करारनामा (HPDA) स्वाक्षांकित करण्यात येतो व त्यांच्या अधिपत्याखाली प्रकल्प विकसनाचे नियंत्रण करण्यात येते. त्याअनुषंगाने खाजगीकरणातून विकसित करण्यात येत असलेल्या तसेच नुतनीकरण व आधुनिकीकरणासाठी प्रस्तावित असलेल्या जलविद्युत प्रकल्पांकरिता पश्चात अर्हता पध्दतीचा अवलंब करुन मागविलेल्या निविदांच्या तांत्रिक छाननीसाठी स्थापत्य व विद्युत प्रतिनिधींचा समावेश असलेली छाननी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

खाजगीकरणातून विकसित करावयाच्या तसेच नुतनीकरण व आधुनिकीकरणासाठी प्रस्तावित असलेल्या २५ मे.वॅ. क्षमतेपर्यंतच्या जलविद्युत प्रकल्पांकरिता राबविण्यात येणा-या निविदांप्रकरणी पश्चात अर्हता पध्दतीचा अवलंब करुन मागविलेल्या निविदांच्या तांत्रिक छाननीसाठी खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई | : | अध्यक्ष |
| २. | प्रकल्पाशी संबंधीत प्रादेशिक मुख्य अभियंता (स्थापत्य)/ प्रकल्पाशी संबंधीत अधीक्षक अभियंता (स्थापत्य), | : | सदस्य |
| ३. | अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ,पुणे | : | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प कार्यालयांतर्गत निविदा मागविणारे अधीक्षक अभियंता | : | सदस्य सचिव |

सदर समितीने प्रर्वतकाने सादर केलेल्या निविदांमधील अटी / शर्ती व निकषांची पूर्तता प्रवर्तक करीत आहे याची पारदर्शकतेच्या दृष्टीने छाननी करुन पुढील उचित कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२०१०२८१५३१३३७०२७ असा आहे सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dnyandeo Ananda Bagade

Digitally signed by Dnyandeo Ananda Bagade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6c9c3f117cf64b38033df6ee6108697532342ef3db994d443607916435f8516, serialNumber=857832272f9c6e57a4d72f8a22cf41cccb1c816e7374da487ed5ee3e377def65, cn=Dnyandeo Ananda Bagade
Date: 2020.10.28 15:34:20 +05'30'

**(ज्ञा.आ.बागडे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
६. मा. विधान सभा / विधान परिषद सदस्य
७. प्रधान सचिव (जलसंपदा), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यकारी संचालक कृष्णा/तापी/गोदावरी/विदर्भ/कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, महाराष्ट्र.
११.महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२.सर्व सह सचिव, उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंदा विभाग, मुंबई.
१४.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१५.अधीक्षक अभियंता, जलविद्युत मंडळ, पुणे/कोल्हापूर/जळगाव/नागपूर,
१६.अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१७. जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ.